"मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम" योजने अंतर्गत शासनाचे सहभाग अनुदान (मार्जिन मनी) वितरीत करणेबाबत. (अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत)

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- योजना-२०१९/प्र.क्र.१६१/उद्योग-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० नोव्हेंबर, २०२१

**संदर्भ:-** १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. मऔधो-२०१९/ प्र.क्र. ०६/ उद्योग-२, दिनांक ०७/०३/०१९.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. योजना-२०१९/प्र.क्र.१२१/उद्योग-७, दिनांक ०१/०८/२०१९.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक योजना-२०१९/प्र.क्र. २३०/ उद्योग-७, दिनांक २३/०१/२०२०.
४) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/जिउके/मुरोनिका/ अनु. जाती प्रस्ताव/२०२१/ए-७१८, दिनांक १३/०८/२०२१.
५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२१/ प्र.क्र.१२/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १२/११/२०२१.

**प्रस्तावना:-**

'प्रधानमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम' (PMEGP) या सद्यस्थितीत कार्यरत असलेल्या योजनेच्या धर्तीवर, 'मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम' (CMEGP) ही योजना संदर्भाधीन क्र. २ येथील दिनांक ०१/०८/२०१९ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आलेली आहे. सदर योजनेअंतर्गत राज्यातील युवक-युवतींना आत्मनिर्भर बनविण्यासाठी स्वयंरोजगार प्रकल्प स्थापित करण्यासाठी राज्य शासनाकडून आर्थिक सहाय्य हे अनुदान स्वरुपात राज्य शासनाच्या अर्थसंकल्पित तरतुदीतून उपलब्ध करुन देण्यात येईल असे राज्याचे औद्योगिक धोरण-२०१९ मध्ये नमूद केले आहे. त्यानुसार सदर योजनेसाठी सर्वसाधारण घटक व आदिवासी घटकांसाठी दिनांक २३/०१/२०२० च्या शासन निर्णयान्वये नवीन लेखाशिर्ष उघडण्यात आले आहे. तसेच अनुसूचित जाती उपयोजना यासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्याकडून उद्दिष्टांच्या प्रमाणानुसार तरतूद उपलब्ध करुन देण्यात येते.

२. सदर योजनेची अंमलबजावणी पूर्णत: ऑनलाईन पद्धतीने उद्योग विभागाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालयाद्वारे जिल्हा उद्योग केंद्रे व खादी ग्रामोद्योग मंडळ यांच्यामार्फत जिल्हा स्तरावर करण्यात येत आहे. त्यानुसार सदर योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गातील ५०३ अनुदान दावे मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम पोर्टलवर प्राप्त झाले असून त्याकरीता आवश्यक मार्जिन मनी रक्कम रुपये ११.४६ कोटी बिडीएस प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यासाठी अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांनी त्यांच्या दिनांक १३/०८/२०२१ च्या पत्रान्वये विनंती केली आहे. उक्त प्रयोजनार्थ सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक १२/११/२०२१ च्या शासन निर्णयान्वये "मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम" या योजनेकरीता अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून विभागास उपलब्ध रुपये ८ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्या दिनांक १२/११/२०२१ च्या शासन निर्णयान्वये "मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम" योजनेअंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाच्या वितरणासाठी प्रलंबित दाव्यांकरीता रुपये ८,००,००,०००/- (अक्षरी रुपये आठ कोटी फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सदर तरतूद आहरण व संवितरण करावयाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

२. सदर प्रयोजनार्थ अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत होणारा खर्च मागणी क्र. एन-३, २८५१ - ग्रामोद्योग व लघु उद्योग, ००, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०३) मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (सीएमईजीपी)(कार्यक्रम)(२८५१ ६६९२), ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६/०४/२०२१, दिनांक २४/०६/२०२१, दिनांक २९/०७/२०२१, दिनांक १४/१०/२०२१ व त्यासोबतच्या परिशिष्टातील तरतुदीनुसार, वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.८९५/व्यय-१४, दिनांक ०७/१०/२०२१ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२१/ प्र.क्र.१२/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १२/११/२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११११३०१५३६४६२५१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJEEV VITTHAL RAJMANE

Digitally signed by RAJEEV VITTHAL RAJMANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=236eb645736d99439ecdba7a9ca089f1295797136f40d4172ad8740745981e39, pseudonym=5986A7EF7C4A5144BE154D090DDF15619B0872E6, serialNumber=9AF1A1281C6D8847D249FEF2488B7CAA84A3751E6EE91EBAA5CC0332D8B30060, cn=RAJEEV VITTHAL RAJMANE
Date: 2021.12.21 17:06:49 +05'30'

**( राजीव राजमाने )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-३२
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, खादी व ग्रामोद्योग महामंडळ, मुंबई.
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळ, मुंबई.
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

७) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

८) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई.

९) सर्व विभागीय उद्योग संचालक.

१०) सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र.

११) वित्त विभाग (व्यय- १४/ व्यय- १६), मंत्रालय, मुंबई-३२.

१२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (अर्थसंकल्प/ विघयो), मंत्रालय, मुंबई-३२.

१३) अवर सचिव (प्रशासन-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१४) निवडनस्ती (उद्योग-७).